जन्म - मृत्यू नोंदणीकरिता आवश्यक कोरे नमुने छपाई करण्यासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जमृनों-२०२४/प्र.क्र.०४/कु.क**
१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १२ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) उप संचालक, आरोग्य सेवा, (आमाजीआ) पुणे यांचे पत्र क्र. संआसे-२/उप संचालक (आमाजीआ) पुणे/कक्ष ८५ड / भांडार / खर्चास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत /१०२८४-८६/२३ दिनांक. १३.१२.२०२३

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र- २०१३/प्र.क्र.३०/ २०१३/विनिमय, भाग-२, दि.१७.०४.२०१५

३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक दि. ०८.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**

जन्म - मृत्यु नोंदणी अधिनियम, १९६९ व महाराष्ट्र जन्म-मृत्यु नोंदणी नियम, २००० नुसार राज्यात जन्म-मृत्यू नोंदणी कार्यक्रम राबविण्यात येतो. उप संचालक आरोग्य सेवा (आमाजीआ), तथा उपमुख्य निबंधक, जन्म-मृत्यू नोंदणी, महाराष्ट्र राज्य पुणे-१ हे कार्यालय जन्म मृत्यु नोंदणीचे राज्यस्तरीय कार्यालय आहे. त्यानुसार उप संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे यांनी संदर्भाधीन पत्र क्र. १ अन्वये जन्म मृत्यु नोंदणीकरीता आवश्यक असलेले रजिस्टरचे कोरे नमूने छपाईकरीता प्रस्ताव सादर केला आहे.

२. सदर कार्यक्रमांर्तगत ग्रामीण भागातील जन्म-मृत्यूच्या नोंदी करण्यासाठी तसेच सार्वजनिक आरोग्य विभागाच्या आरोग्य संस्थांमध्ये जन्म-मृत्युच्या नोंदी करण्यासाठी रजिस्टरचा उपयोग होतो. त्यानुषंगाने लेखाशिर्ष क्रमाक-२२१०१०९१, (२१) पुरवठा व सामुग्री यामधून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात रुपये ८०,००,०००/-(रूपये ऐंशी लक्ष फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला होता व त्यानुषंगाने संदर्भ क्र. ३ अन्वये सदर निधीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. परंतु, सन २०२४-२५ च्या सुधारित अंदाजानुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी सदर लेखाशिर्षांतर्गत रू.५६,००,०००/- (रूपये छप्पन लक्ष फक्त) इतकीच तरतूद करण्यात आली असल्यामुळे जन्म मृत्यु नोंदणीकरिता आवश्यक रजिस्टरचे कोरे नमूने छपाईकरिता रू. ५६,००,०००/- (रूपये छप्पन लक्ष फक्त) इतका निधी संबंधीत यंत्रणेस वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ च्या सुधारित अंदाजानुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी रू.५६,००,०००/-(रूपये छप्पन लक्ष फक्त) इतका निधी (लेखाशिर्ष- २२१० १०९१) संबंधीत यंत्रणेस

खालील विवरणपत्रातील रजिस्टर छपाईसाठी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**जन्म मृत्यू नोंदीचे कोरे नमुने छपाईच्या विवरणपत्राचा तपशील**

| अ.क्र | नमुना क्रमांक | रजिस्टरमधील पानांची संख्या | एकूण रजिस्टरची संख्या |
|---|---|---|---|
| १ | जन्म नमूना क्र. १ | २५ | १११११०० |
| २ | मृत्यू नमूना क्र. २ | २५ | ८८८८१ |
| ३ | उपजत मृत्यू नमूना क्र. ३ | २५ | ४३८६० |
| ४ | मासिक अहवाल गोषवारा नमुना क्र-११,१२,१३ | २५ | ५५८४० |
| ५ | मृत्यूच्या कारणांचे सर्वेक्षण(ग्रामीण योजना नमूना "अ" जन्म) | २०० | २१७३ |
| ६ | मृत्युंच्या कारणांचे सर्वेक्षण (ग्रामीण योजना नमूना "ब" मृत्यू) | २०० | २१६२ |
| ७ | मृत्यूच्या कारणांचे सर्वेक्षण (ग्रामीण योजना नमूना "क" मृत्यूचे कारण) | २०० | २१८२ |
| ८ | मृत्युंच्या कारणांचे वैदयकिय प्रमाणपत्र नमुना क्र. ४ | ३० | ३५९६१ |
| ९ | मृत्युंच्या कारणांचे वैदयकिय प्रमाणपत्र नमुना क्र. ४ अ | ३० | १७९६१ |

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, उप संचालक (आमाजिआ) तथा उप मुख्य निबंधक, जन्म व मृत्यू कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व उप संचालक, आरोग्य सेवा (आमाजिआ) तथा उप मुख्य निबंधक, जन्म व मृत्यू, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर खर्च लेखाशिर्ष क्र. २२१० १०९१, (२१) पुरवठा व सामुग्री या बाबीअंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानापैकी बिडिएस प्रणालीवर वितरीत केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत करावा.

४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील

अनुक्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर निधीच्या प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३११२००५२४७३१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL MAHADEV KUMERIYE

Digitally signed by ANIL MAHADEV KUMERIYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7de2c699c260e8b545f2736f6acef82da11a2da0a65565e5bcb99995bc112fe6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C4770170FA4EC3BAEC96D0FA6B787BC46960639B94799F693E5F126CA6F1AF70, cn=ANIL MAHADEV KUMERIYE
Date: 2024.03.12 11:36:39 +05'30'

**(अनिल कुमेरिये)**
**कार्यासन अधिकारी महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई,पुणे.
३) संचालक, शासकीय मुद्रण व लेखन सामग्री व प्रकाशनालय, मुंबई.
४) सह संचालक आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई
५) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
८) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
१०) उप संचालक, आरोग्य सेवा (आमाजिआ) तथा उप मुख्य निबंधक, जन्म मृत्यू, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) प्रशासकीय अधिकारी, उप संचालक (आमाजिआ) तथा उप मुख्य निबंधक कार्यालय, जन्म व मृत्यू, महाराष्ट्र राज्य, पुणे
११) निवडनस्ती (कुटुंब कल्याण)